महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळाच्या कर्मचा-यांचे वेतन अदा करण्यासाठी आकस्मिकता निधी मधून रु. १२० कोटी रक्कम वितरीत करण्याबाबत....

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्र.एसटीसी ११२०/प्र.क्र.३८४ /परि-१**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : १० नोव्हेंबर, २०२०.

वाचा : - शासन ज्ञापन, वित्त विभाग क्रमांक आकनि २०२०/प्र.क्र.८/अर्थ-११, दि. १०.११.२०२०.

**प्रस्तावना -:**

कोविड -१९ आजाराच्या पार्श्वभूमीवर घोषित केलेल्या टाळेबंदीमुळे महाराष्ट्र राज्य परिवहन महामंडळाची अत्यावश्यक वाहतूक सेवा वगळता बहुतांशी वाहतुक बंद असल्याने रा.प. महामंडळाचे उत्पन्न घटल्यामुळे महामंडळाच्या कर्मचाऱ्यांचे वेतन थकलेले आहे. त्यामुळे रा.प. महामंडळास कर्मचा-यांचे वेतन अदा करण्यासाठी निधी मंजूर करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळास कर्मचाऱ्यांचे प्रलंबीत वेतन अदा करण्यासाठी उपरोक्त संदर्भाधिन ज्ञापनाव्दारे आकस्मिकता निधीमधून रु. १२० कोटी (अक्षरी रुपये एकशेवीस कोटी फक्त) एवढी रक्कम मंजूर करण्यात आली आहे. सदर मंजूर निधी रा.प. महामंडळास अदा करण्यास या शासन निर्णयाव्दारे मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर खर्च खालील लेखाशिर्षांतर्गत भागविण्यात यावा:-

मागणी क्रमांक बी-३,
२०४१, वाहनांवरील कर
००, ००१, संचालन व प्रशासन
(०१) परिवहन आयुक्त
(०१) (०१) आस्थापना - परिवहन आयुक्त, (दत्तमत्त) (अनिवार्य)
(२०४१ ००१८) ३३, अर्थसहाय्य"
आकस्मिकता निधी संकेतांक (८००० ७७०७)

३. यासाठी परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांना प्राधिकृत करण्यात येत असून त्यांच्या कार्यालयातील आंहरण व संवितरण अधिकारी असलेले लेखाधिकारी यांनी सदर रक्कम आंहरित करुन महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळास अदा करावी.

४. परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य यांनी आकस्मिकता निधीमधून खर्च करण्यासाठी आंहरण व संवितरण अधिका-याकडे रक्कम सुपुर्द करण्यासंबधीच्या आदेशात आगावू रक्कमेतून खर्च करताना कोषागारात सादर करण्यात येणा-या देयकांवर आकस्मिकता निधी अग्रीम शासन ज्ञापन, वित्त विभाग क्रमांक आकनि २०२०/प्र.क्र. ८ / अर्थ ११, दि. १०.११.२०२० अन्वये मंजूर असे लाल शाईने लिहावे, अशा स्पष्ट सुचना नमूद करुन ही सुचना लाल शाईने अधोरेखीत करावी. सदर निधी आंहरित करुन हा खर्च वेळेत होईल हे परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य यांनी पहावे. तसेच याबाबतचा खर्चाचा अहवाल शासनास त्वरीत सादर करावा.

५. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. २४०/२०२०/व्यय-८, दि.१०.११.२०२० व शासन ज्ञापन, वित्त विभाग क्रमांक आकनि २०२०/प्र.क्र.८/अर्थ ११, दिनांक १०.११.२०२० अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०२०१११०१७५६४९१५२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Meghana Gaurav Shinde

Digitally signed by Meghana Gaurav Shinde
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Deaprtment, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d29224e30812c4523eedb32c54f5cbc27548f81ccf656192b6d735115af1dfb8, cn=Meghana Gaurav Shinde
Date: 2020.11.10 20:14:35 +05'30'

**( मेघना गौरव शिंदे )**

**कार्यासन अधिकारी, गृह विभाग**

**प्रत,**

१. मा. राज्यपालांचे सचिव, राजभवन , मुंबई
२. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा. उपमुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई
४. सर्व मा. मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
५. मा. सभापती, महाराष्ट्र विधान परिषद यांचे खाजगी सचिव, विधान भवन, मुंबई

६. मा.अध्यक्ष , महाराष्ट्र विधान सभा यांचे खाजगी सचिव, विधान भवन, मुंबई
७. मा. विरोधी पक्ष नेता, महाराष्ट्र विधान सभा यांचे खाजगी सचिव, विधान भवन, मुंबई
८. मा. विरोधी पक्ष नेता, महाराष्ट्र विधान परिषद यांचे खाजगी सचिव, विधान भवन, मुंबई
९. अपर मुख्य सचिव(वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
१०.परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
११.उपाध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळ, मुंबई
१२.वित्तिय सल्लागार व मुख्य लेखा अधिकारी, महाराष्ट्र रा.मार्ग परिवहन महामंडळ, मुंबई
१३.महालेखापाल १/२ (लेखा व अनुज्ञेयता /लेखा परिक्षा), महाराष्ट्र, मुंबई / नागपूर
१४.महालेखापाल (वाणिज्यिक लेखा परिक्षा), मुंबई,
१५.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१६.निवासी लेखा परिक्षा अधिकारी, वांद्रे (पूर्व), मुंबई ४०० ०५१
१७.वित्त विभाग (व्यय -८/साऊ/ अर्थसंकल्प-११/अर्थोपाय) मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
१८. गृह विभाग (बीयुडी-१/बीयुडी-२) मंत्रालय, मुंबई
१९.निवडनस्ती/परि १.